**महाराष्ट्र स्वयंअर्थसहाय्यित शाळा (स्थापना व विनियमन) अधिनियम २०१२ अंतर्गत स्वयंअर्थसहाय्यित तत्वावर नवीन शाळा स्थापन करणे, तसेच, विद्यमान शाळेचा दर्जावाढ करण्यासाठी २०१६-१७ या शैक्षणिक वर्षाकरीता परवानगी देण्याबाबत ....**

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः एसएफएस-१०१६/प्र.क्र.२९७/एसएम- २**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक: ०३ मार्च, २०१७

**प्रस्तावना -**

१. राजमाता संस्था, भांबेड, ता.लांजा, जि. रत्नागिरी संचलित माऊली विद्यालय, भांबेड, ता. लांजा, जि.रत्नागिरी या शाळेस स्वयंअर्थसहाय्यित तत्वावर मान्यता देण्याचा प्रस्ताव शासनास सादर झाला होता. सदर प्रस्तावास मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय-**

२.१ महाराष्ट्र स्वयंअर्थसहाय्यित शाळा (स्थापना व विनियमन) अधिनियम, २०१२ (सन २०१३ चा ०१) अंतर्गत राजमाता संस्था, भांबेड, ता.लांजा, जि. रत्नागिरी संचलित माऊली विद्यालय, भांबेड, ता. लांजा, जि.रत्नागिरी या शाळेस (प्राथमिक ते उच्च प्राथमिक, इ. १ ली ते ८ वी, इंग्रजी माध्यम, राज्य मंडळ) सन २०१६-१७ या शैक्षणिक वर्षापासून नवीन शाळा सुरू करण्यास खालील अटी व शर्तीची पूर्तता करण्याच्या अधीन राहून शासन परवानगी देण्यात येत आहे .

२.२ **अटी व शर्ती** -

(१) सदर शाळेने **बालकांचा मोफत व सक्तीच्या शिक्षणाचा अधिकार अधिनियम, २००९ व या अंतर्गत केलेले व केले जाणारे सर्व नियमांची /तरतुदींची पुर्तता करणे आवश्यक आहे**.

(२) संबधित शाळेच्या व्यवस्थापनाने **अधिनियम, २००९** मधील तरतुदींची पुर्तता करुन सन २०१६-१७ या शैक्षणिक वर्षात शाळा सुरु करण्यास खालीलप्रमाणे परवानगी (इरादा पत्र) देण्यात येत आहे:-

**अ)** व्यवस्थापनाकडे शाळा स्थापन करण्यासाठी शासनाच्या विहित नियमानुसार आवश्यक असलेल्या सर्व बाबींची पुर्तता असल्यास शैक्षणिक वर्ष सुरु झाल्यापासून **एक महिन्याच्या आत** प्रथम मान्यतेसाठी संबंधित जिल्ह्यांच्या शिक्षणाधिकाऱ्यांकडे व्यवस्थापनाने अर्ज करावा.

**ब)** व्यवस्थापनास सन २०१६-१७ करिता या शासन निर्णयाद्वारे पात्र ठरविण्यात आले असल्यास शाळा स्थापन करण्यासाठी शासनाच्या विहित नियमानुसार आवश्यक असलेल्या सर्व बाबी उपलब्ध नसतील तर त्यांना सदर बाबींची पूर्तता करण्यासाठी या शासन निर्णयाच्या दिनांकापासून **अठरा महिन्याच्या** आत शाळा सुरु करणे बंधनकारक राहील अन्यथा दिलेली परवानगी आपोआपच **रद्दबातल** ठरेल.

(३) परवानगी देण्यात आलेल्या नवीन शाळेस i) शासनाच्या वेळोवेळी निर्गमित होणा-या आदेशांचे व कार्यपध्दतीचे तसेच, ii) महाराष्ट्र स्वयंअर्थसहाय्यित शाळा (स्थापना व विनियमन) अधिनियम, २०१२ (सन २०१३ चा ०१) मधील सर्व तरतूदींचे पालन करणे **बंधनकारक** राहील

(४) संबंधित सक्षम अधिका-यांनी अधिनियम, २००९ मधील तरतुदींची पुर्तता झाली असल्याची खात्री करावी व त्यानंतरच **प्रथम मान्यता** देण्याबाबतची पुढील कार्यवाही करावी.

(५) संस्थेने शाळा परवानगीसाठी मागणी केलेले **माध्यम**, शाळेचे **ठिकाण** इत्यादी मध्ये भविष्यात कोणताही बदल करता येणार नाही. शासनाने ज्या ठिकाणासाठी शाळा परवानगी दिलेली आहे त्या ठिकाणा व्यतिरिक्त अन्य ठिकाणी शाळा सुरु केल्यास शासनाने दिलेली परवानगी **आपोआपच रद्द** समजण्यात येईल.

(६) **यु-डायस डाटा:-** या शासन निर्णयाद्वारे परवानगी देण्यात आलेल्या **नवीन शाळा / दर्जावाढ शाळा** बाबत जिल्हानिहाय U-DISE(Unified District Information System for Education) मध्ये माहिती भरताना,"***स्वयंअर्थसहाय्यित तत्वावरील परवानगी प्राप्त शाळा***" म्हणून स्वतंत्र प्रवर्गात नोंद करुन क्रमांक प्राप्त करुन घेण्याबाबतची जबाबदारी संबंधित संस्थेवर राहील. याबाबतची पुढील कार्यवाही करण्यासाठी **राज्य प्रकल्प संचालक, महाराष्ट्र प्राथमिक शिक्षण परिषद, मुंबई** यांना **नोडल अधिकारी** म्हणून घोषित करण्यात येत आहे. त्याचप्रमाणे, संस्थेने, सर्व संबंधितांच्या माहितीकरीता **" स्वयंअर्थसहाय्यित तत्वावरील परवानगी प्राप्त नवीन शाळा/ दर्जावाढ परवानगी प्राप्त शाळा"** असा जाहीर फलक शाळेच्या बाहेर प्रवेशद्वारावर लावणे आवश्यक राहील.

३. सदर आदेश संबधित संस्थेस १५ दिवसात कळविण्याची जबाबदारी संबंधित विभागीय शिक्षण उपसंचालक यांची राहील.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०१७०३०२१२२६०७०४२१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Ramchandra Ganpat Gunjal

Digitally signed by Ramchandra Ganpat Gunjal
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Deputy Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=dc74b0493b4979ad0aa76763f873c23fa35ecb44970562d4aa14a832b6357e54, cn=Ramchandra Ganpat Gunjal
Date: 2017.03.07 15:23:46 +05'30'

**( रा.ग.गुंजाळ )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. आयुक्त(शिक्षण), महाराष्ट्र राज्य, पुणे
२. राज्य प्रकल्प संचालक, महाराष्ट्र प्राथमिक शिक्षण परिषद, मुंबई
३. शिक्षण संचालक (माध्यमिक व उच्च माध्यमिक), महाराष्ट्र राज्य, पुणे
४. शिक्षण संचालक (प्राथमिक), महाराष्ट्र राज्य, पुणे

५. विभागीय शिक्षण उपसंचालक, कोल्हापूर

६. शिक्षणाधिकारी, जिल्हा परिषद (प्राथमिक / माध्यमिक), रत्नागिरी

७. निवडनस्ती (एसएम-२).